राज्यातील महानगरपालिका तसेच अ,ब व क वर्गाच्या नगरपरिषदेसाठी प्रचलित असलेल्या विकास नियंत्रण नियमावलीमध्ये बदल करण्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम,१९६६ च्या कलम-१५४ अन्वये निदेश.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक:संकिर्ण-२००२/अनौ-२९८/प्र.क्र.२५८/०३/नवि-१२
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक:-१० जून,२००४

महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६.

महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम,१९६६ मधील तरतुदीनुसार ज्या महानगरपालिका/नगरपालिका/नगरपरिषदांच्या विकास योजना शासनाने मंजूर केल्या आहेत किंवा ज्या ठिकाणी महानगरपालिका तसेच अ, ब व क वर्ग विकास नियंत्रण नियमावली उपयोगात आणली जाते त्या महानगरपालिका/नगरपालिका/नगरपरिषद हद्दीमध्ये रस्त्याच्या कडेला होणा-या अनिर्बंध वसाहती रोखण्यासाठी पथकिनारवर्ती नियम तयार करणेत आलेले आहेत व या नियमात इमारत रेषा व नियंत्रण रेषा किती अंतरावर असाव्यात हे मुंबई महामार्ग अधिनियम,१९५५ महाराष्ट्र जमिन महसुल अधिनियम,१९६९ केंद्र शासनाच्या भूपृष्ठमंत्रालयाचे दि.१३.१.१९७७ च्या मार्गदर्शक सूचना व महानगरपालिका तसेच अ,ब व क वर्ग साठीची विकास नियंत्रण नियमावली यामध्ये नमूद करण्यात आलेले आहे. तथापि यामध्ये एकसूत्रता नसल्याने यासाठी कोणते अंतर घ्यावे याबाबत संभ्रम निर्माण होतो. सबब सदर विकास नियंत्रण नियमावलीमध्ये द्रूतगती मार्ग, राष्ट्रीय महामार्ग, प्रमुख राज्यमार्ग, राज्यमार्ग व प्रमुख जिल्हा मार्गापासून सर्व महानगरपालिका/नगरपालिका/नगरपरिषदेसाठी इमारत रेषा व नियंत्रण रेषा यामध्ये एकसूत्रता आणणे आवश्यक असल्याने विनियमात तरतुद करणे आवश्यक ठरते.

०२. वरील नियमात एकसूत्रता आणण्यासाठी इमारत रेषा व नियंत्रण रेषा याकरिता सुधारित अंतरे सार्वजनिक बांधकाम विभागाचे शासन निर्णय क्र.आरबीडी-१०८९/८७१/रस्ते-७, दि.९ मार्च,२००१ पूरकपत्र क्रमांक-आरबीडी-१००१/७२/रस्ते-७, दि.२१.९.२००१ व शुध्दीपत्रक क्र.आर.बी.डी-१००१/७२/रस्ते-७, दि.७.१.२००२ नुसार लागू करण्यात आलेली आहेत. वरील शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या इमारत रेषा व नियंत्रण रेषेच्या अंतराचा समावेश करण्याबरोबरच द्रूतगती मार्ग, राष्ट्रीय महामार्ग, प्रमुख राज्यमार्ग/राज्यमार्ग व प्रमुख जिल्हा मार्ग या रस्त्याच्या विद्यमान किंवा यथास्थिती प्रस्तावित हद्दीपलिकडे सेवा रस्ते प्रस्तावित करण्याबाबत राज्यातील महानगरपालिका/नगरपालिका/नगरपरिषदांच्या विकास नियंत्रण नियमावलीमध्ये समाविष्ट करणे आवश्यक असल्याने खालीलप्रमाणे कार्यवाही करणेबाबत महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम,१९६६ चे कलम १५४ (१) अन्वये खालील निदेश देण्यात येत आहेत.

कृमाप....

-- नि दे श --

१) महाराष्ट्रातील महानगरपालिका तसेच "अ", "ब" व "क" वर्ग नगरपालिकांनी त्यांच्या प्रचलित विकास नियंत्रण नियमावलीतील तरतुदीमध्ये वर नमूद केलेल्या सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय दि.९.३.२००१, दि.२१.९.२००१ व दि.७.१.२००२ अन्वये दिलेल्या नियम अथवा शासनाने वेळोवेळी सुधारित केलेले नियम लागू राहतील, अशा तरतुदीचा समावेश करण्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम,१९६६ च्या कलम ३७ अन्वये कार्यवाही करुन तसे प्रस्ताव शासनास मंजूरीसाठी सादर करावेत.

२) महानगरपालिका/नगरपालिका/नगरपरिषदा यांच्या विद्यमान व वाढीव हद्दीमधील अभिन्यास मंजूरीचेवेळी अविकसित भागामधून जाणा-या द्रूतगती मार्ग, राष्ट्रीय महामार्ग, प्रमुख राज्यमार्ग/राज्य मार्ग व प्रमुख जिल्हा मार्ग रस्त्याच्या या विद्यमान किंवा यथास्थिती प्रस्तावित हद्दपलिकडे रस्त्याच्या दोन्ही बाजूस १२ मीटर रुंदीचे सेवारस्ते अशा अभिन्यासात ठेवणे बंधनकारक राहील.

३) सेवारस्ते पुरविल्या न गेलेल्या महानगरपालिका/ नगरपालिका/नगरपरिषदा यांच्या विकसित भागातील सार्वजनिक बांधकाम विभागाच्या रस्त्याच्या कडेने असलेल्या भूखंडावरील बांधकाम परवानगीसाठी उपरोक्त शासन निर्णयामध्ये विहित केलेली इमारत रेषा व नियंत्रण रेषेची अंतरे तसेच याबाबत वेळोवेळी सुधारित करण्यात आलेली अंतरे लागू राहतील तसेच याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मान्यतेविना कोणत्याही प्रकरणी सवलत देण्यात येवू नये.

४) उपरोक्त क्र.१ ते ३ मध्ये नमूद केलेले निदेश सदर आदेशाच्या दिनांकापासून तात्काळ अंमलात आणावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सुधाकर नागनुरे )
महाराष्ट्र शासनाचे उपसचिव.

त माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी..

१) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (रस्ते-७), मंत्रालय, मुंबई.

२) प्रधान सचिव (महसुल), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.